(२५७)
230

20150423120103092 7

कावाडे खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड नुतनीकरणाचे कामास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- खाभूयो २०१०/२७७/(१०७/२०१०)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक :- १९/०३/२०१३.

पहावे :- १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्रमांक ३८०६/कवाडे/तां-२(१)/१६३०, दिनांक ८/०३/२०१०

**प्रस्तावना :-**

कावाडे खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड ही योजना बृहत आराखड्यात समाविष्ट असून केंद्रीय पर्यावरण व वन मंत्रालयाने सदर योजनेस दि.२२/०८/२००३ अन्वये अधिनियम १९९१ मधून किनारी नियमन क्षेत्रातून (CRZ) सूट दिली आहे. सदरची योजना यार्डकालीन योजना आहे. सततची भरती ओहोटी व अतिवृष्टीमुळे बांधांचे मोठे नुकसान झाले आहे. तसेच उघाड्या पूर्णपणे नादुरुस्त झालेल्या आहे. सदर योजनेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित आहे. सदर योजनेचा प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव, मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी शासनास सादर केला होता. तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**

कावाडे खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड या योजनेस सन २००८-२००९ च्या दरसुचीवर आधारित, प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रूपये ३,२८,००,७७७/- (रूपये तीन कोटी, अठ्ठावीस लक्ष, सातशे सत्याहत्तर फक्त) यापैकी कामाप्रित्यर्थ रूपये २,९८,३७,०७०/- व रूपये २९,६३,७०७/- अनुषंगिक खर्च या रक्कमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यात आला आहे.

२. या योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-३, मुख्य लेखाशिर्ष "४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद खार जमीन योजना(१) बांधकामे योजनांतर्गत" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व त्यावरील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय पाटबंधारे व वीज विभाग क्र.एमएफच १०७३/३२६५३/ई(३),दि.१०.७.१९७४ मधील परिशिष्ट क्र.(३) व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२००६/प्र.क्र.(८२/०६) विनियम दि.१२.३.२००७ मधील तरतूदीनुसार आतंर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

४. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता (०९/२०१०) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(स.बा.सलाम)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा) मुंबई / नागपूर
वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग (१४६१), मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
आतंर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अधिक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे (सोबत अंदाजपत्रक)
कार्यकारी अभियंता, खारभूमी सर्वेक्षण व अन्वेषण विभाग, पेण, जि.रायगड
उप अभियंता (खारभूमी), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
अर्थ शाखा १ /२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
लपा १ (२ प्रती) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, रायगड
स्वीय सहाय्यक, मा.मंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहाय्यक, मा.राज्यमंत्री (खारजमीन), मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालक, मंत्रालय, मुंबई (२ प्रती)
*संगणक कक्ष, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई*
खारभूमी कार्यासन संग्रहार्थ.

C:\DOCUME~1\ADMINI~1\MYDOCU~1\patil\suprama gr.doc

शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१०/२७७/(१०७/२०१०) खारभूमी दिनांक १९/०३/२०१० चे सहपत्र
कावाडे खारभूमी योजना ता.अलिबाग, जि.रायगड अंदाजपत्रकाचा गोषवारा

| अ.क्र. | बाब | एकूण रुपयात |
|---|---|---|
| १ | "ए" प्राथमिक | १२८३१५ |
| २ | "बी" (भूसंपादने) | २००००० |
| ३ | "सी" मुख्य कामे | २२१६१२०३ |
| ४ | "एफ" उघाडी काम | ३५५०४८३ |
| ५ | "के" इमारती | ५१४२३३ |
| ६ | "एम" वृक्षारोपन | १२०८९७ |
| ७ | "ओ" संकिर्ण | २५००० |
| ८ | "पी" देखभाल | ६४२७१ |
| ९ | "आर" दळणवळण | ३०७२७०० |
| | कामाप्रित्यर्थ किंमत | २९८३७०७० |
| | अनुषंगिक खर्च (भूसंपादन किंमत वगळून १० टक्के) | २९६३७०७ |
| | एकूण | ३२८००७७७ |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | २७३.७० हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | ११९८४२ < १३३००० मापदंडात बसते |
| लाभव्यय गुणोत्तर) | २.९३ > १.०० मापदंडात बसते |
| दरसूची वर्ष | २००८-०९ |

C:\DOCUME~1\ADMINI~1\MYDOCU~1\patil\suprama gr.doc